**आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)" म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.२३०/मातं**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:-** १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा-प्रशा-५, दि.१४ फेब्रुवारी,२०२४.
२) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक मातंस-२०२४/रोख/प्र.क्र.३४/ई-८३७९०३,दिनांक ३० डिसेंबर, २०२४.
३) विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.२३०/का.३९ (मातं), दि.१७ डिसेंबर, २०२४.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाने संदर्भ क्रमांक (१) येथील त्यांच्या दिनांक १४ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिकारी यांचेकरिता "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)" ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करणेबाबतच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार, उपरोक्त नमूद शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१० अन्वये महाराष्ट्र कोषागार नियम (म.को.नि.) नमुना क्रमांक ४४ देयकांद्वारे २७- लहान बांधकामे, ३१ - सहायक अनुदान (वेतनेतर), ३३- अर्थसहाय्य, ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०- इतर खर्च, ५३- मोठी बांधकामे आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत राज्याच्या एकत्रित निधीमधून आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी क्षेत्रिय आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिकाऱ्यांना वित्त विभागाच्या सहमतीने आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA) म्हणून घोषित करण्यासाठी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग सक्षम असतील, असे नमूद केले आहे.

त्यानुषंगाने संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांनी त्यांच्या संदर्भ क्रमांक (२) येथील दिनांक ३० डिसेंबर,२०२४ रोजीच्या पत्रान्वये राज्य सेतू महाराष्ट्र संस्था व राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोग येथील वित्तीय कामकाजाचे प्रभारी अधिकारी यांना वित्त विभाग व महालेखापाल यांच्या मान्यतेने VPDAA घोषित करण्याबाबत शासन स्तरावर निर्णय होऊन शासन निर्णय निर्गमित करण्याची विनंती केली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णय दि. १७.१२.२०२४ अन्वये राज्य सेतू महाराष्ट्र संस्थेकरिता माहिती तंत्रज्ञान संचालनालयातील लेखा अधिकारी व राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोगातील वित्तीय कामकाज हाताळणारे सहाय्यक लेखा अधिकारी यांना "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA) म्हणून घोषित करण्यात आले होते. परंतु सदर शासन निर्णयान्वये घोषित केलेल्या VPDAA च्या पदनामामध्ये बदल करणेबाबत उप अधिदान व लेखाधिकारी यांनी महिती व तंत्रज्ञान संचालनालयास कळविले. त्यानुसार Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA) पदनामामध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. ३ येथे नमूद दिनांक १७ डिसेंबर, २०२४ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

**२.** राज्य सेतू संस्था व राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोगातील वित्तीय कामकाज हाताळणाऱ्या अधिकारी यांना वित्त विभाग, शासन निर्णय दि.१४ फेब्रुवारी, २०२४ मधील तरतूदीनुसार म.को.नि. नमुना क्रमांक ४४ देयकांद्वारे २७- लहान बांधकामे, (कार्यक्रम) ३१ - सहायक अनुदान (वेतनेतर ), ३३ - अर्थसहाय्य, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान,५० - इतर खर्च ५३ - मोठी बांधकामे आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत राज्याच्या एकत्रित निधीमधून आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी खालील योजनांकरिता “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA) म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

**(१)** ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी सेतू महाराष्ट्र संस्थेस सहायक अनुदान (२०५२०५८२) (कार्यक्रम) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) याकरिता माहिती तंत्रज्ञान संचालनालयातील कार्यासन अधिकारी यांना "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" **Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**(२)** विज्ञान व तंत्रज्ञान यामध्ये समन्वय व संशोधन, (२२५२००४२) (कार्यक्रम) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) याकरिता राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोगातील वित्त व लेखा अधिकारी (कक्ष अधिकारी दर्जा) यांना “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA) म्हणून घोषित करण्यात येत आहे.

The VPD account shall be opened under:-

| | |
|---|---|
| MH 8443 Civil Deposits | ८४४३ दिवाणी ठेवी |
| 00 | ०० |
| 106 Personal Deposit | १०६ वैयक्तिक लेखा |
| (००) (०२) Virtual Personal Deposit Account | (००) (०२) आभासी वैयक्तिक ठेव लेखा |

The following conditions shall be applicable to the Virtual Personal Deposit Account (VPDA)

1. The said VPDA shall be subject to Audit.
2. The Administrator shall ensure that all rules, regulations, terms, and conditions of the relevant GR have been followed in respect of the said VPDA.
3. No amount shall be transferred to the VPDA to avoid lapse of funds.
4. VPDA is applicable only for the State scheme and not for the central sector and centrally sponsored schemes.
5. **The Receipt to the said VPDA shall be only such grants drawn under MTR 44 for the 31 Grants in Aid (Non-Salary) under the MH 2052- Secretariat General Services with CRC20520582 and MH2251- Secretariat Social Service with CRC 22510042. No amount under Capital Heads & Loan heads of expenditure shall be transferred to VPDA. The Administrator shall timely submit the Utilisation Certificate after incurring expenditure from the VPDA.**
6. The Expenditure from the VPDA shall be as per the Sanction order of the respective Grant.
7. The unspent balances under the VPDA shall be credited back to the Consolidated Fund after completion of one year from the date of drawl of the amount of funds date of

credit of the amount to the VPDA or the timeline mentioned in the sanction order, whichever is earlier.

8. The balances under the VPDA shall be reconciled monthly by the Administrator with the District Treasury Officer.

9. The balances shall be reconciled with the AG office by the Treasury Officer who shall submit the Balance Certificate to A.G. office for confirmation of their balances in the books of A.G at the end of the Financial Year.

10. All conditions/instructions in the Finance Department G.R.No.संकीर्ण/२०२३ प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५ दिनांक १४ फेब्रुवारी, २०२४ shall be followed.

11. All Rules, including Rule ४९५ of the Maharashtra Treasury Rules, १९६८ shall be applicable to the VPDA.

३. सबब, सदर शासन निर्णय वित्त विभाग, संदर्भ क्र. ५४३/२०२४/व्यय-४, दिनांक २५ सप्टेंबर, २०२४ व अनौपचारिक संदर्भ क्र. २९३/२०२४/कोषा प्रशा-५, दिनांक ३० सप्टेंबर, २०२४ आणि महालेखापाल (ले.व अ.) कार्यालयाचा अनौपचारिक संदर्भ क्र.TM/Ch.2/UOR N0.३१०/सामान्य प्रशासन विभाग/२०२४-२५/२३१८, दिनांक १४.०२.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०२२११७५११७८६०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by BHARATI DINESH DHURI
Date: 2025.02.21 17:53:12 +05'30'

**( भारती दि. धुरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), नागपूर.
३. जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
५. उप सचिव, वित्त विभाग, (कोषा प्रशा-५),मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवडनस्ती/मातं.